# जेव्हा गुहेतील माणसे चित्रे काढू लागली



लेखक: नॉर्मन बेट



फार फार वर्षांपूर्वी, जग आजच्यापेक्षा खूप वेगळे होते. त्याकाळी मोठमोठे जंगली आणि हिंस्त्र प्राणी जमिनीवर फिरत असत....

आणि लोक गुहांमध्ये राहात असत.



लोक जंगली प्राण्यांइतके मोठे आणि ताकदवान नव्हते. त्यांच्याकडे फक्त दगडी कुऱ्हाडी आणि दगडी भाले एवढीच हत्यारे होती.

आपल्या संरक्षणासाठी लोक समूह करून राहात आणि एकत्र शिकार करत.

लोक आपल्या टोळीतील एखाद्या वृद्ध माणसाच्या जादुई शक्तींवर श्रद्धा ठेवत. वृद्ध माणसाने गुहेतील भिंतींवर जी प्राण्यांची चित्रे काढली होती तीच त्याच्या जादुचा स्रोत होती.



एके दिवशी, या टोळीतील एक मुलगा एका टेकडीच्या उतारावर शांतपणे बसून खाली दरीत न्याहाळत होता. त्याला माहीत होते की प्राणी आंघोळ करण्यासाठी किंवा तहान भागवण्यासाठी जंगलातून बाहेर नदीकिनारी येतात.

त्याला एखादा ताकदवान जंगली बैल किंवा गुहेतील अस्वल किंवा शक्तिशाली उरुस दिसू शकला असता. त्याला एखादे केसाळ डुक्कर किंवा रेनडियर किंवा चपळ, जंगली तट्टू दिसू शकला असता.

तो या प्राण्यांना चांगला ओळखत होता. त्याने या प्राण्यांना जादुई गुहेच्या भिंतींवर वृद्ध माणसाने काढलेल्या चित्रांमध्ये पाहिले होते.

मुलाने नदीकिनारी काही हालचाल झाल्याचे पाहिले.

कित्येक जंगली बैल जंगलातून बाहेर आले. ते खूप मोठे होते. तो एकटा त्यांची शिकार करू शकला नसता. आपल्या टोळीकडे परतून तो शिकाऱ्यांना ही खबर देऊ शकला असता. मग त्यांनी शिकारीची योजना बनवली असती.

तो आवाज न करता टेकडीवर चढू लागला आणि मग आपल्या लोकांच्या गुहेकडे वेगाने धावू लागला.



उड्या मारून मुलाने खाच-खळगे, खडक, कपारी ओलांडले. हिंस्त्र श्वापदे त्याचा पाठलाग करू शकणार नाहीत अशा वाटांवर तो पळू लागला.

तो नदीपासून दूर दूर गेला.

मुलगा गुहेत पोहोचला तेव्हा त्याला खूप धाप लागली होती आणि तो थरथरत होता. कसेबसे त्याने शिकाऱ्यांना आपण पाहिलेल्या नवीनच मोठ्या प्राण्यांबद्दल सांगितले. मुलाने त्या प्राण्यांचा आकार, त्यांचे डोळे, त्यांची कातडी आणि एकामागे एक असलेली दोन टोकदार शिंगे यांचे वर्णन करून सांगितले.

अशा वर्णनाचा प्राणी शिकाऱ्यांनी याआधी कधी बघितला नव्हता.

त्यामुळे त्या सर्वांना भय वाटू लागले.







मग मुलाने चमत्कारी वृद्ध माणसाचा शोध घेतला. तो वृद्ध माणसाच्या जादुई गुहेतील गर्द, वळणदार वाटांवरून रांगत आत गेला.

गुहेतील भिंती शेकडो प्राण्यांच्या चित्रांनी सजल्या होत्या.

भिंतींवर जंगली बैल, उरुस, महाकाय काळे बैल, लाल रेनडियर, तपकिरी घोडे आणि पिवळे तट्टू या प्राण्यांची चित्रे होती.

चित्रांतील प्राणी धावत होते वा उड्या मारत होते वा भाला लागून एक बाजूला पडत होते. प्रत्येक प्राणी जिवंत वाटत होता.



वृद्ध माणूस गुहेच्या टोकाला आग करून बसला होता. मुलाने त्याला आपण पाहिलेल्या भयंकर प्राण्याबद्दल सांगितले.

वृद्ध माणसाने ऐकून घेतले आणि मग बराच वेळ तो शांत बसून राहिला.

हा प्राणी त्यालासुद्धा अनोळखीच होता. त्याच्या चित्रांमध्ये असा प्राणी नव्हता. त्याच्याआधीच्या चित्रकारांनी काढून ठेवलेल्या चित्रांमध्येही असा प्राणी नव्हता. वृद्ध माणसाचा मुलाने सांगितलेल्या गोष्टीवर विश्वास बसला नाही, तरीही....

तोसुद्धा घाबरला.

मग तो बोलू लागला. त्याने मुलाला सांगितले की त्या नवीन प्राण्याच्या चित्राची जादूच लोकांचे भय दूर करेल.

आता त्याला नवे चित्र काढायला नव्या रंगांची, कुंचल्यांची गरज होती. खडकांवर चित्राच्या रेषा कोरण्यासाठी त्याला तीक्ष्ण दगडी अवजारांची गरज होती.

त्याला उजेडासाठी बऱ्याच दिव्यांची गरज होती. त्याला एका उंच, मजबूत फळीची गरज होती. त्यावर बसून तो चित्र काढणार होता.

त्याने मुलाला या सगळ्या वस्तू गोळा करायला सांगितल्या.

मुलगा पुन्हा शिकाऱ्यांकडे गेला. त्याने एका फळीची गरज असल्याचे सांगितले.

शिकारी जंगलात गेले आणि त्यांनी आपल्या दगडी कुऱ्हाडींनी काही लहान झाडे तोडली. मग त्यांनी झाडाचा एक-एक बुंधा ओढत गुहेतील वळणदार मार्गांनी आत आणला. मग त्यांनी चामड्याच्या पट्ट्यांनी हे बुंधे एकत्र बांधले.

अशा तऱ्हेने एक मजबूत फळी तयार झाली.





मग मुलाने शिकाऱ्यांकडे त्यांचे दगडी चाकू मागितले. त्याने त्यांतील सर्वोत्तम आणि सर्वात धारदार चाकू निवडून वृद्ध माणसाला दिला.

वृद्ध माणूस फळीवर चढला आणि गुहेच्या भिंतीच्या मऊ खडकावर त्या महान नवीन प्राण्याची रुपरेषा कोरू लागला.

मुलाने कटोऱ्याच्या आकाराचे पोकळ दगड गोळा केले आणि त्यांच्यात प्राण्यांची वितळलेली चरबी भरली. प्रत्येक कटोऱ्यात त्याने झाडाच्या आतील सालीपासून बनलेली एक वात ठेवली. हे दिवे घेऊन तो गुहेत आला आणि त्याने वात पेटवली.





मुलाने जंगली मधमाश्यांच्या पोळ्यामधून मेण गोळा केला आणि तो रंगीत मातीत मिसळला. मग त्याने प्रत्येक रंगाच्या मेणाचे मिश्रण आपल्या दोन हातांच्या मध्ये धरून गुंडाळ्या केल्या आणि क्रेयॉनच्या कांड्यांसारख्या जाड रंगीत कांड्या बनवल्या.

वृद्ध माणसाला कुंचल्याची गरज होती. मुलाने प्राण्यांच्या केंसांचे झुबके डहाळीच्या टोकाला बांधले आणि कुंचला तयार केला. काही कुंचले त्याने तंतूमय रोपट्यांची टोके कापून तयार केले.

वृद्ध माणूस काम करत होता तेव्हा मुलगा नदीकिनारी गेला. तिथे खोदकाम करून त्याने सुकलेल्या मातीची ढेकळं बाहेर काढली. ढेकळं विविध रंगांची होती – लाल, पिवळी, तपकिरी, राखाडी.

त्याने रंगांनुसार ढेकळं वेगवेगळी ठेवली आणि प्रत्येक ढेकूळ दोन सपाट दगडांमध्ये दाबून माती बारीक केली. आता त्याच्याकडे वेगवेगळ्या रंगांच्या मातीचे ढीग होते.

मग त्याने प्रत्येक ढीग प्राण्यांच्या वितळलेल्या चरबीत मिसळला आणि एक उत्तम द्रव रंग बनवला. हा रंग ताजा राहावा, सुकू नये म्हणून त्याने तो पोकळ हाडांमध्ये ओतला.



मग मुलगा रंगांनी भरलेली सारे हाडे, कुंचले आणि मेण खाली जादुई गुहेत घेऊन गेला. तिथे वृद्ध माणूस काम करत होता.

तो फळीच्या खाली उभा राहिला आणि ऐकू लागला. वृद्ध माणूस काही मंत्र पुटपुटत होता.

मुलाला सांगण्यात आले होते की मंत्रांचे शब्द पृथ्वी आणि आकाशात प्रवास करू शकतात. हे मंत्र भयानक नव्या प्राण्यांपर्यंतही पोहोचतील आणि त्यांना कमी हिंस्त्र करतील. हे मंत्र शिकाऱ्यांपर्यंतही पोहोचतील आणि त्यांना मजबूत व चलाख बनवतील, ज्यामुळे ते शिकार करण्यात यशस्वी होतील.

मुलाला जाणवले की हे अनोळखी आणि रहस्यमय शब्द शिकून घ्यायला हवेत.





मग मुलाने वृद्ध माणसाने भिंतीवर कोरलेल्या हिंस्त्र प्राण्याची रुपरेषा पाहिली.

ते चित्र त्याने पाहिलेल्या महाकाय, भयंकर प्राण्यासारखे अजिबात दिसत नव्हते.

मुलाने वृद्ध माणसाला हे समजावण्याचा प्रयत्न केला – पण वृद्ध माणसाने त्याचे ऐकले नाही.

मुलाला भय वाटले.

त्याने गप्प राहून वृद्ध माणसाला मदत केली. त्याने आगीची काजळी आणि दिव्याची वितळलेली चरबी एकत्र करून काळा रंग बनवला.

वृद्ध माणूस नव्या प्राण्याच्या रुपरेषेवर काळ्या रंगाचे रुंद आणि जाडजूड फटकारे मारू लागला. त्याने खडकाच्या कणांच्या आत खोलवर रंग जाऊ दिले.

जेव्हा प्राण्याची रुपरेषा रंगवून पूर्ण झाली तेव्हा वृद्ध माणसाने रंगीत मेणाच्या कांड्या वापरून प्राण्याच्या कातडीवरील सुरकुत्या आणि घड्या काढल्या. मग त्याने पिवळा आणि लाल रंग वापरून प्राण्याच्या शरीरावरील खुणा दाखवल्या. शेवटी, त्याने गडद रंग वापरून सावल्या दाखवल्या आणि प्राण्याला गोलाई दिली.

मुलगा बघत राहिला, ऐकत राहिला – कारण वृद्ध माणसाने मंत्राचा उच्चार अध्येमध्ये एकदाही बंद केला नाही.







पूर्ण झालेले चित्र खूप मोठे होते. त्यात एक असा प्राणी दाखवला होता जे पृथ्वी हलवू शकेल आणि आपल्या दोन्ही टोकदार शिंगांनी कुणाही मनुष्याची चिरफाड करू शकेल.

मुलाने त्या चित्राकडे पाहिले. त्याने भिंतींवर पूर्वी काढलेल्या इतर प्राण्यांच्या चित्रांकडेही पाहिले.

नवा प्राणी जंगली घोडा किंवा छोट्या तट्टूसारखा मुलायम आणि आकर्षक दिसत नव्हता.



त्याच्यात महाकाय बैलांच्या रुपरेषा व खुणा दिसत नव्हत्या की या बैलांसोबत धावणाऱ्या रेनडियरसारखे सौंदर्य व मार्दव दिसत नव्हते.

चित्रातील नवा प्राणी गोल, खराखुरा आणि भयानक दिसत होता. पण तो मुलाने पाहिलेल्या प्राण्यासारखा दिसत नव्हता!

मुलाला भीती वाटली की वृद्ध माणसाचे जादूई मंत्र काही काम करणार नाहीत.

मग जादुई गुहेत शिकारी आले. त्यांनी फळी, रंग आणि साधने दूर सारले. लहान आगी जाळण्यात आल्या. वृद्ध माणसाने पक्ष्यांसारखा मुखवटा आणि पिसे व फरने बनलेला छानसा लांब झगा घातला. त्याने एक जादुची छडी घेतली. त्याच्या टोकाला लाकडी पक्षी कोरलेला होता.

शिकारी गाऊ लागले, मंत्रोच्चार करू लागले आणि नाचू लागले. त्यांच्या हलणाऱ्या शरीराच्या विचित्र सावल्या भिंतींवर पडल्या. प्रत्येक माणसाने त्याच्या भाल्याने नव्या चित्राला स्पर्श केला.

त्यांना वाटले की वृद्ध माणसाच्या चित्राची जादू त्यांच्या भाल्याच्या टोकातून वाहात येईल आणि त्यांना शिकारीसाठी ताकद व कौशल्य देईल.





वृद्ध माणूससुद्धा मंत्रोच्चार करू लागला, नाचू लागला. मग तो गुहेतून बाहेर पडला आणि रात्रीच्या काळोखात निघून गेला. तो सर्वोच्च टेकडीवर चढला आणि तिथे उभा राहून आपल्या मुखवट्याचा चेहरा ताऱ्यांच्या दिशेत रोखला.

त्याने अज्ञात दैवतांना साद घातली की त्याची जादू दऱ्याखोऱ्यातं पसरू दे, लोकांना घाबरवणाऱ्या रहस्यमय नव्या प्राण्यापर्यंत पोहोचू दे.

शिकाऱ्यांचा नाच संपला तेव्हा पहाट झाली होती आणि त्यांच्यात खूप धैर्य आले होते.

त्यांची जादू अद्याप मजबूत होती. म्हणून ते गुहा सोडून बाहेर पडले. मुलगा त्यांना नवीन भयंकर प्राणी पाहिला होता त्या जागेवर घेऊन गेला.

पण त्यांना विचित्र नवा प्राणी काही दिसला नाही,



त्यांनी दिवसभर शोध घेतला.

त्यांनी अनेक प्राणी पाहिले, पण त्यांनी एकाचीही शिकार केली नाही. जेव्हा महाकाय बैल आणि उरुस वाटेत भेटले तेव्हा त्यांनी त्यांना जाऊ दिले. कुणा दुसऱ्या प्राण्याला मारल्यामुळे त्यांच्या भाल्याची जादू कमजोर होत असे.

सूर्यास्त होऊ लागला तसे त्यांना मोठमोठे आवाज ऐकू आले. हे आवाज नदीकिनाऱ्यावरून येत होते.

प्राण्यांनी डरकाळ्या फोडल्या. ते फुरफुरू लागले!

झाडे उन्मळून पडली!

जमीन थरथरू लागली.

मग सगळं शांत झालं. मोठ्या सावधपणे मुलगा आणि शिकारी नदीजवळ पोहोचले. त्यांचे भाले सज्ज होते.

पण समोरचे दृश्य पाहून ते स्तब्ध झाले.







कापलेल्या झाडांच्या गर्दीत महाकाय बैल उभा होता. त्याचे शरीर फाटले होते. बैल कमजोरीमुळे थरथरत होता. काही वेळातच तो जमीनीवर आडवा पडला.

त्याच्या पायांजवळ चमत्कारी वृद्ध माणूस पडला होता. त्याच्या अंगावर अद्यापही पक्ष्याचा मुखवटा आणि पिसे व फरपासून बनलेला झगा होता. त्याची नक्षीदार जादुई छडी त्याच्या निर्जीव हातापाशी पडली होती.

वृद्ध माणूस आणि मरायला टेकलेला बैल यांच्याजवळून एक मोठा गेंडा गेला. त्याची दोन्ही शिंगे रक्ताने आणि फरने माखली होती.

शिकाऱ्यांनी गेंड्यासारखा प्राणी पूर्वी कधी पाहिला नव्हता. असा प्राणी त्यांनी वृद्ध माणसाच्या चित्रांमध्येही पाहिला नव्हता.

पण मुलाला जाणवले की आपण या प्राण्याला पूर्वी कुठेतरी पाहिले आहे.



शिकाऱ्यांनी त्यांचे भाले महाकाय गेंड्यावर फेकले. त्यांचे हत्यार थेट गेंड्याच्या अंगावर जाऊन आदळले....

पण भाले त्या प्राण्याच्या जाडजूड कातडीवर आपटून त्याला काहीही इजा न करता जमिनीवर पडले. वृद्ध माणसाची जादू निष्फळ ठरली.

शिकारी पुन्हा एकदा घाबरले.

गेंडा फुरफुरला आणि सावकाश चालत दूर गेला. तो नदीकिनारी असलेल्या गर्द जंगलात नाहीसा झाला.

प्राणी निघून गेल्यावर, शिकाऱ्यांनी वृद्ध माणसाला उचलले आणि परत त्याच्या गुहेत नेले.

त्याला गुहेच्या अगदी टोकाला कोपऱ्यात नेले आणि तिथे एका खोल, अरुंद खड्ड्यात त्याचे दफन केले.

मग मुलाला जाणवले की आता त्याला आपल्या लोकांचे रक्षण केले पाहिजे.

मुलाने सगळी अवजारे, कुंचले आणि रंग गोळा केले. त्याने सगळे जादुई मंत्र आठवून पाहिले आणि तो वृद्ध माणसाच्या कबरीच्या वर असलेल्या भिंतीवर चित्र रंगवू लागला.

शिकारी बघतच बसले, मुलाचे मंत्रोच्चार ऐकत राहिले.

अचानक, त्यांची भीती कमी झाली.





शिकाऱ्यांकडे खूप धैर्य गोळा झाले. त्यांनी जाणले की मुलाने काढलेले गेंड्याचे चित्र अस्सल होते.

त्याच्या चित्रातील गेंडा अगदी हुबेहूब त्यांनी पाहिलेल्या खऱ्या गेंड्यासारखा दिसत होता.

त्या दिवसानंतर, तो मुलगा गुहेचा चित्रकार बनला. भविष्यात तोसुद्धा वृद्ध माणसासारखाच बनणार होता.

आणि मग टोळीतील माणसे भीती न बाळगता पुन्हा शिकार करायला सज्ज झाले.

मुलाने नदीकिनारी पाहिलेल्या लढाईचे चित्र काढले होते. त्यात एकीकडे जखमी बैल होता, त्याच्यानजिक वृद्ध माणूस जमिनीवर पडला होता आणि शक्तिशाली गेंडा त्यांच्यापासून दूर चालला होता.





हे सगळं वीस हजार वर्षांपूर्वी घडले. पण बैल, उरुस, घोडे, वृद्ध माणूस आणि गेंडा यांची चित्रे आजही पाहायला मिळतात.

ही चित्रे फ्रान्समधील लास्को येथील गुहेतील भिंती आणि छतांवर आढळतात. तिथे शेकडो इतरही प्राण्यांचीही चित्रे आहेत.

समाप्त